**पोलीस पाटीलांच्या मानधनात, प्रवास व दैनिक भत्त्याच्या दरात वाढ.**

# महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीव्हीपी ०६११/प्र.क्र. ४१८/पोल-८

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक : १५ ऑक्टोबर, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय गृह विभाग क्र. बिव्हीपी ०१८३/१४६६७/पोल-८, दि. ४.१.१९९०.
२) शासन निर्णय गृह विभाग क्र. बिव्हीपी ०१०३/प्र.क्र.८/भाग-२/पोल-८, दि. २६.१०.२००४.

**प्रस्तावना :-** दि. १.४.२००४ पासून पोलीस पाटीलांस दरमहा रु. ८००/- दराने मानधन व दि. ४.१.१९९० पासून, अंतरानुसार १५ किमीपर्यंत रु. २०/-, २५ किमीपर्यंत ३० आणि व २५ किमीपेक्षा जास्त अंतरासाठी रु. ४०/- याप्रमाणे दैनिक भत्ता देण्यात येत होता. काळाच्या ओघात झालेली भाववाढ, व पोलीस पाटीलांना पार पाडावी लागणारी इतर कर्तव्ये (उदा. महात्मा गांधी तंटामुक्त गाव योजना-पदसिध्द सचिव) विचारात घेऊन, सध्याच्या मानधनात व प्रवास व दैनिक भत्त्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** वरील बाबींचा सर्वांगीण विचार करुन, दिनांक १ जानेवारी, २०१२ पासून राज्यातील पोलीस पाटीलांचे मानधन रु. ८००/- वरुन रुपये ३,०००/- (अक्षरी रुपये तीन हजार फक्त) पर्यंत वाढ करण्यास तसेच, पोलीस पाटीलांना पुढीलप्रमाणे सुधारीत दराने प्रवास व दैनिक भत्ता अदा करण्यास शासन या निर्णयाद्वारे मंजुरी देत आहे.

| | पोलीस ठाणे व गाव यामधील अंतर | प्रवास व दैनिक भत्त्याचा दर |
|---|---|---|
| अ. | १५ कि.मी.पर्यंत | रु. ५०/- |
| ब. | २५ कि.मी.पर्यंत | रु. ७५/- |
| क. | २५ कि.मी.पेक्षा जास्त | रु. १००/- |

२. सन २०११-१२ या वित्तीय वर्षातील, जानेवारी-फेब्रुवारी २०१२ या दोन महिन्याचे वाढीव मानधन, प्रवास व दैनिक भत्त्याची वाढीव रक्कम अदा करण्याकरीता, होणारा खर्च "२०५५, पोलीस (००) ११० ग्राम पोलीस, (००) (०१) पोलीस पाटील व मेवास पोलीस

(२०५५ ०२२१), ५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली हिवाळी अधिवेशनात पूरवणी मागणी टाकून करण्यात येणाऱ्या व तद्नंतर वेळोवेळी करण्यात येणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुतचे आदेश वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४६३/११/व्यय-७, दिनांक ४.८.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०१११०१४१७०९२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ.न.नाईकनवरे)
सह सचिव, गृह विभाग,

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.१
मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई.
महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपविभागीय अधिकारी (जिल्हाधिकाऱ्यांमार्फत)
सर्व पोलीस आयुक्त (बृहन्मुंबई व रेल्वे वगळून)
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.
सर्व जिल्हा कोषागार/उप कोषागार अधिकारी.
वित्त विभाग (सेवा-६/व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (पोल-८/आस्था-३)